अकृषि विद्यापीठांसाठी वाहनांची किंमत मर्यादा विहित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१५८/२१/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख:- ०८ सप्टेंबर, २०२१

वाचा:-

१) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दि.२८.०७.२०२०.

प्रस्तावना :-

वित्त विभागाने शासन निर्णय दि. २८ जुलै, २०२० अन्वये शासनाचे विविध पदाधिकारी/अधिकारी यांना त्यांच्या दर्जानुसार वाहन खरेदी करता वाहनांची किंमत मर्यादा काय असेल याबाबत सर्वसमावेशक धोरण विहित केलेले आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद ५ नुसार शासन निर्णयातील तरतुदी स्वायत्त संस्था/सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम/मंडळे/महामंडळे यांना लागू असतील असे नमुद केलेले आहे. तथापि सदर शासन निर्णयानुसार विद्यापीठातील सांविधिक पदाधिकारी, जसे कुलगुरू, प्र-कुलगरु तसेच कुलसचिव इ. आणि विद्यापीठ व्यवस्थापन परिषदेने वाहन अनुज्ञेय केलेल्या अधिकाऱ्यांसाठी वाहन खरेदीच्या किंमतीची मर्यादा किती असेल याबाबत निश्चित तरतूद नमूद नाही.

२. अकृषि विद्यापीठांना विविध स्त्रोतांमार्फत निधी प्राप्त होत असतो अशा निधींमधून विद्यापीठे विविध प्रकारच्या शैक्षणिक बाबीं, शैक्षणिक साहित्य तसेच प्रशासकीय बाबींशी निगडीत घटकांची खरेदी करणे, इ. साठी खर्च करीत असतात. विद्यापीठांना शासनाकडून अथवा अन्य स्त्रोतांमार्फत प्राप्त होणारा निधी हा सार्वजनिक स्वरूपाचा निधी आहे. त्यामुळे अशा निधीचा उपयोग शासनाने विहित केलेल्या नियमानुसार होणे अपेक्षित आहे.

३. तथापि मागील काही वर्षांमध्ये विद्यापीठ प्रशासनाकडून वाहन खरेदी करताना शासन नियमांचे पालन न करता अधिक किंमतीची वाहने खरेदी केली जात असल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे. तसेच भविष्यात देखील अशा प्रकारे वाहन खरेदी विद्यापीठ प्रशासनाकडून होण्याची शक्यता नाकारता येत नाही. त्यामुळे विद्यापीठांसाठी वाहन खरेदी संदर्भात वित्त विभागाच्या दि.२८.०७.२०२० च्या शासन निर्णयातील तरतूदी विचारात घेऊन एकसमान धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

अकृषि विद्यापीठांना खालील नमूद केलेल्या किंमतीच्या मर्यादेत वाहन खरेदी करता येईल.

| क्र. | पदाधिकारी / अधिकारी पदनामे | वाहनांचा प्रकार | किंमत मर्यादा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | कुलगुरू | त्यांच्या पसंतीनुसार तथापि स्तंभ क्र. ४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे विनिर्दिष्ट किंमत मर्यादेत. | रु. १२.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तू व सेवा कर + टेंम्पररी रजिस्टेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) ईत्यादी अंतर्भूत करून एकूण रु. १२.०० लक्षच्या मर्यादेत.) |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | प्र-कुलगुरु | ------”------ | रु. १०.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तू व सेवा कर + टेंम्परری रजिस्टेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) ईत्यादी अंतर्भूत करून एकूण रु. १०.०० लक्षच्या मर्यादेत.) |
| ३ | कुलसचिव / संचालक परीक्षा व मुल्यमापन मंडळ / वित्त व लेखा अधिकारी | ------”------ | रु. ९.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तू व सेवा कर + टेंम्पररी रजिस्टेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) ईत्यादी अंतर्भूत करून एकूण रु. ९.०० लक्षच्या मर्यादेत.) |
| ४ | विद्यापीठ व्यवस्थापन परिषदेच्या मान्यतेने वाहन अनुज्ञेय केलेले इतर अधिकारी | ------”------ | रु. ८.०० लक्ष (वाहनाची किंमत + वस्तू व सेवा कर + टेंम्पररी रजिस्टेशन चार्जेस + सहाय्यभुत साहित्य (Accessories) ईत्यादी अंतर्भूत करून एकूण रु. ८.०० लक्षच्या मर्यादेत.) |

२. वाहन खरेदीबाबत वित्त विभागाने संदर्भाधीन दि. २८.०७.२०२० च्या शासन निर्णयान्वये तसेच वेळोवेळी विहित केलेल्या धोरण/मार्गदर्शक सूचनांनुसार किंमत मर्यादेत वाहन खरेदी होईल, याची काटेकोरपणे सर्व अकृषि विद्यापीठांनी दक्षता घ्यावी.

३. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संकेतांक क्र. २०२१०९०८१२२६३९४८०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.09.08 16:53:31 +05'30'

**( अजित बाविस्कर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. कुलगुरू, सर्व अकृषि विद्यापीठे,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई-१, महाराष्ट्र, (५ प्रती),
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) मुंबई-१, महाराष्ट्र, (५ प्रती),
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर-२, महाराष्ट्र, (५ प्रती),
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) नागपूर-२, महाराष्ट्र, (५ प्रती),
८. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण,

१०. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे,
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१२. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व कार्यासने,
१५. निवड नस्ती (विशि-१)